**प्रधानमंत्री मुद्रा योजनेचा लाभ जास्तीत जास्त तरुणांना मिळावा यासाठी या योजनेचा प्रचार, प्रसार व समन्वयासाठी जिल्हास्तरावर गठित प्रधानमंत्री मुद्रा योजना जिल्हा समन्वय समिती, मुंबई उपनगर व ठाणे यांना अतिरिक्त निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एसएलबीसी-१६१८/प्र.क्र.५०/का.१४१७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ जानेवारी, २०१९.

**वाचा:**

१. नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसएलबीसी-१६१६/प्र.क्र.४९/का.१४१७, दि.१४ जून, २०१६.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८.
३. नियोजन विभाग, पत्र क्रमांक : एसएलबीसी-१६१८/प्र.क्र.११५/का-१४१७, दि.२८ नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना:**

प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेचे राज्यस्तरीय संमेलन दिनांक १९ डिसेंबर, २०१८ रोजी मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे अध्यक्षतेखाली संपन्न झाले आहे. सदर संमेलनास राज्यातील मुद्रा योजनेचे राज्यस्तरीय तसेच जिल्हास्तरीय अशासकीय समितीचे सदस्य, विविध बँकांचे वरीष्ठ अधिकारी व वरीष्ठ पातळीवरील शासकीय अधिकारी यांची प्रमुख उपस्थिती होती. सदर संमेलनासाठी सभागृह सजावट व अनुषंगिक कामे ही जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांचे कार्यालयाकडून व यशोगाथांची पुस्तक छपाईचे काम जिल्हाधिकारी, ठाणे यांचे कार्यालयाकडून करण्यात आले आहे. सदरच्या दोन्ही जिल्हयांना उपरोक्त नमूद बाबींसाठी अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

जिल्हाधिकारी मुंबई उपनगर व ठाणे यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या प्रधानमंत्री मुद्रा बँक योजना समन्वय समितीस संदर्भाधीन शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांच्या अधिन राहून राज्यस्तरीय संमेलन दिनांक १९ डिसेंबर, २०१८ रोजी संपन्न झालेल्या कार्यक्रमातील बाबींसाठी खालीलप्रमाणे एकूण रू.१७,५७,५०४/- (अक्षरी रूपये सतरा लाख सत्तावन्न हजार पाचशे चार फक्त) अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मुद्रा बँक योजना जिल्हा समन्वय समिती | सन २०१८-१९ मध्ये द्यावयाचा अतिरिक्त निधी (रुपये) |
|---|---|---|
| १ | मुंबई उपनगर | १४,५७,५०४/- |
| २ | ठाणे | ३,००,०००/- |

(अक्षरी रूपये सतरा लाख सत्तावन्न हजार पाचशे चार फक्त)

२. प्रधानमंत्री मुद्रा संमेलन दि.१९ डिसेंबर, २०१८ या कार्यक्रमासाठी रू.१७,५७,५०४/- एकूण अतिरिक्त निधी कोषागार कार्यालयातून आहरित व संवितरीत करण्यासाठी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर व ठाणे हे "नियंत्रक अधिकारी" राहतील, तसेच जिल्हा नियोजन अधिकारी, मुंबई उपनगर व ठाणे हे "आहरण व संवितरण" अधिकारी असतील. सदर अतिरिक्त निधी रू.१७,५७,५०४/- च्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी शासनाला देण्याची जबाबदारी "नियंत्रक अधिकारी" म्हणून संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

३. उपरोक्त खर्च हा लेखाशीर्ष मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०१) नियोजन विभाग, (०१) (११) मुद्रा बँक योजनेचा प्रचार, प्रसार आणि समन्वय (योजनांतर्गत) (दत्तमत), २६ जाहिरात व प्रसिध्दी (३४५१ अे ००१) या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारास अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१११४४९१७६५१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2019.01.11 14:58:54 +05'30'

**( प्रियांका रं. छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, ठाणे.
७. जिल्हा नियोजन अधिकारी, मुंबई उपनगर, ठाणे.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई उपनगर, ठाणे.
९. वित्त विभाग/व्यय-८, अर्थ-१६, मंत्रालय, मुंबई ३२.
१०.कार्यासन अधिकारी (का. १४११/१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई- ३२.
११.निवडनस्ती, कार्यासन १४१७.